राज्य अल्पसंख्यांक आयोग स्थापन करणेबाबत.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्ण,क्रमांक: एलएमएन-१०९१/७८१/सीआर-४८/अ.क.,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- १७ फेब्रुवारी,१९९२.

शासन निर्णय:-

दिनांक १२ जानेवारी,१९७८ च्या निर्णयाद्वारे केंद्र शासनाने देशातील अल्पसंख्यांकाच्या हिताचे रक्षण करण्यासाठी राष्ट्रीय स्तरावर अल्पसंख्यांक आयोगाची स्थापना केलेली आहे. त्याच धर्तीवर राज्य शासनाने महाराष्ट्र राज्यातील अल्पसंख्यांकाच्या हिताची जोपासना करण्यासाठी राज्यस्तरावर राज्य अल्पसंख्यांक आयोग स्थापन करावा अशा प्रकारची शिफारस राष्ट्रीय स्तरावरील अल्पसंख्यांक आयोगाने महाराष्ट्र शासनाला केली होती. या शिफारशींचा साकल्याने विचार केल्यानंतर राज्य अल्पसंख्यांक आयोग स्थापनकरण्यास राज्यशासनाने मान्यता दिलेली आहे. या शासन निर्णयाद्वारे राज्य अल्पसंख्यांक आयोग स्थापन करण्यात येत आहे.

२. राज्य अल्पसंख्यांक आयोगाची रचना खालीलप्रमाणे राहील :-

अ] सदर आयोग एक अध्यक्ष, १० सदस्ये व एक विशेष कार्य अधिकारी यांचा राहील.

ब] सदर आयोगाचा कालावधी आयोग प्रत्यक्ष स्थापन झाल्याच्या दिनांका-पासून ३ वर्षे इतका राहील.

क] आयोगाचे अध्यक्ष,इतर १० सदस्य व विशेष कार्य अधिकारी यांच्या नियुक्तीचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

३. राज्य अल्पसंख्यांक आयोगाची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील. :-

अ] भारताच्या संविधानाद्वारे अल्पसंख्यांकाचे रक्षण करण्यासाठी ज्या विविध संरक्षण उपाययोजना नमूद केलेल्या आहेत त्याची व राज्यशासनाने पारित केलेल्या विविध अधिनियमाचे मुल्यमापन करणे.

ब] उपरोक्त संरक्षण उपाययोजना व अधिनियम यांची परिणामकारक अंमलबजावणी होते किंवा नाही हे पाहण्यासाठी शिफारस करणे,

क] अल्पसंख्यांकाच्या बाबतीत केंद्र/राज्यशासनाच्या धोरणाच्या अंमलबजावणीचा आढावा घेणे,

ड] अल्पसंख्यांक संरक्षक उपाययोजना व त्यांच्या अधिकारापासून त्यांना वंचित करण्यात येत असल्याबद्दलच्या विशिष्ट तक्रारींमध्ये लक्ष घालणे,

इ] अल्पसंख्यांकाच्या बाबतीत भेदभाव दाखविला जाऊ नये यासाठी विविध अभ्यास व विश्लेषणे हाती घेणे,

फ] केंद्र/राज्यशासनास कोणत्याही एका अल्पसंख्यांकाच्या उचित विधी व ... कल्याणार्थ करावयाच्या उपाययोजना सुचविणे,

ग] अल्पसंख्यांकाच्या परिस्थितीविषयी माहिती गोळा करुन ती राज्य/राष्ट्रीय स्तरावर पुरविणे व

ह] अल्पसंख्यांकाच्या तक्रारी व गा-हाणी सदर आयोगास ज्यावेळी प्राप्त होतील त्यावेळी त्याची चौकशी करुन आपला अहवाल राज्यशासनास सादर करणे.

ई] राज्यशासनास वार्षिक अहवाल व शिफारशी सादर करणे.

४. आयोगावर सोपविलेली जबाबदारी पार पाडण्यासाठी स्वत:ची कार्यपध्दती राज्य अल्पसंख्यांक आयोग ठरविले. सदर आयोगास आवश्यकता भासेल त्याप्रमाणे राज्यशासनाचे सर्व विभाग व इतर कार्यालये आवश्यक ती माहिती व कागदपत्रे वेळोवेळी आयोगास सादर करतील तसेच, राज्य शासनाचे विविध उपक्रम सदर आयोगास आवश्यक ते सहकार्य व मदत उपलब्ध करुन देतील.

५. राज्य अल्पसंख्यांक आयोगाचे कार्यालय, अध्यक्ष, सदस्य आणि विशेष कार्यकारी अधिकारी यांची नियुक्ती, अध्यक्षांना दयावयाचे मानधन व सदस्यांना दयावयाचा दैनिक भत्ता व इतर सुविधाबाबत जरुर ते आदेश निराळेरित्या निर्गमित करण्यात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही/-

[ अ. व. आम्बेरकर ]
उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग.

प्रत,

१. राज्यपालांचे सचिव,
२. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,

[कृ. मा. प. ]

३. सर्व मंत्री/राज्यमंत्री/उप मंत्री याचे खाजगी सचिव,

४. महालेखापाल,महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,

५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,

७. सर्व विभागीय आयुक्त,

८. सर्व जिल्हाधिकारी,

९. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषदा,

१०. सर्व मंत्रालयीन विभाग,

११. मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील सर्व विभाग व कार्यालय प्रमुख,

१२. राज्यशासनाचे सर्व उपक्रम,

१३. प्रबंधक,मुळ न्याय शाखा,उच्च न्यायालय मुंबई,]

१४. प्रबंधक,अपील शाखा,उच्च न्यायालय, मुंबई,] [पत्राने]

१५. प्रबंधक,लोक आयुक्त व उपलोक आयुक्त कार्यालय, मुंबई,]

१६. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,]

१७. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,]

१८. महासंचालक,माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई [प्रसिध्दीसाठी]

१९. निवड नस्ती,

२०. सचिव [सामान्य प्रशासन] याचे स्वीय सहाय्यक [सामान्य उपविभाग]